क्रमांकः- मागणी-२००९ / प्र.क्र. ९ / आस्था-९

Website- http://ruraldev.maharashtra.gov.in
Email-RDD_Services_DO15@maharashtra.gov.in
दुरध्वनी - ०२२ २२७९३३८३
फॅक्स : ०२२ २२८३१०१७

ग्राम विकास व जलसंधारण विभाग
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- १९ ऑक्टोबर,२०११.

प्रति,
मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व ) ,
जिल्हा परिषद

विषय :- ग्राम सेवक व ग्राम विकास अधिकारी यांचे गोपनीय अहवाल लिहिणे बाबत

महाराष्ट्र राज्य विस्तार अधिकारी ( पंचायत ) संघटना यांनी ग्रामसेवक व ग्राम विकास अधिकारी यांचे गोपनीय अहवाल लिहिण्याचे अधिकार देण्याबाबतची शासनाकडे मागणी केली होती. मात्र वर्ग-३ मधील अधिका-यांना गोपनीय अहवाल लिहिण्याचे अधिकार देता येत नाही. या बाबीच्या अनुषंगाने संघटनेची मागणी शासनाकडे विचाराधीन होती.

२. ग्रामपंचायत स्तरावर कृषि विभाग, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, बांधकाम विभाग, लघु पाटबंधारे विभाग, इ. विभागाकडून योजना राबविल्या जातात. सदर योजना राबविण्यासाठी त्या त्या विभागाकडून निधी वितरीत केला जातो. त्याबाबत करण्यात आलेल्या अंमलबजावणी बाबतचे मुल्यमापन गट विकास अधिकारी यांचेकडून करण्यात येते. परंतु प्रत्यक्षात ग्रामसेवक व ग्राम विकास अधिकारी यांचे कामकाजावर संपूर्ण नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विस्तार अधिकारी (पंचायत ) या संवर्गाकडे आहे. ही बाब विचारात घेतल्यास ग्रामसेवक व ग्राम विकास अधिकारी यांचेकडून विविध शासकीय योजना व इतर कामे प्रभावीपणे राबवून घेण्याकरीता विस्तार अधिकारी यांना अतिरिक्त अधिकार प्रदान केल्यास सदर कामे यशस्वी व प्रभावीरित्या पूर्ण करणे शक्य होईल. ही बाब विचारात घेवून शासनाचे असे आदेश आहेत की, विस्तार अधिकारी (पंचायत ) यांनी ग्रामसेवक व ग्राम विकास अधिकारी यांच्या कामाचे मुल्यमापन करुन त्याबाबतचे त्यांचे अभिप्राय गट विकास अधिकारी यांना द्यावेत व या अभिप्रायाच्या आधारे गट विकास अधिकारी यांनी ग्राम विकास अधिकारी व ग्राम सेवक यांचा अहवाल लिहावा. हे आदेश चालू अहवाल वर्षापासून अंमलात येतील.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी ही बाब सर्व गट विकास अधिकारी व विस्तार अधिकारी (पंचायत ) यांच्या निदर्शनास आणावी.

( प्रकाश हिर्लेकर )
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत :- विभागीय आयुक्त (सर्व ) यांना आवश्यक त्या कार्यवाहीसाठी रवाना
निवड नस्ती - आस्था-९